नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उप अभियंता (स्थापत्य/मेकॅनिकल/विद्युत) या संवर्गातील पदांच्या नेमणूकीच्या अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीचे सेवाप्रवेश नियमात सुधारणा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- नमुंम-१२२४/सं.क्र.५१/प्र. क्र. २०/नवि-२८**
४ था मजला, मंत्रालय (मुख्य इमारत),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २८ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:**-१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. नमुंम-१२१९/प्र.क्र.१३७/नवि-२८, दि.०९.०४.२०२१.
२) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंम/सा.प्र./आस्था-१/सं.क्र.१३९ (भाग-१)/६७/२०२४/कक्ष-१, दि.०८.०१.२०२४.
३) नवी मुंबई महानगरपालिका यांचा प्रशासकीय ठराव क्र. ५४४१, दि.२६.१२.२०२३.
४) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. नमुंम-१२२४/सं.क्र.५१/प्र. क्र. २०/नवि-२८, दि.२४.०७.२०२४.

**प्रस्तावना:-**

नवी मुंबई महानगरपालिका सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ यास दि.०९.०४.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली असून, सदर सेवा प्रवेश नियमामधील काही पदांच्या सेवा प्रवेश नियमात सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन दि.०८.०१.२०२४ च्या पत्रान्वये, आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

२. प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने काही संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये दि.२४.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये बदल करण्यात आलेला आहे. त्यावर संबंधितांचे प्राप्त निवेदन, आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचा दि. ०८.०१.२०२४ रोजीचा प्रस्ताव व दि.२६.१२.२०२३ रोजी पारीत केलेला प्रशासकीय ठराव क्र. ५४४१ विचारात घेता, त्यामधील उप अभियंता (स्थापत्य/मेकॅनिकल/विद्युत) या पदांच्या सेवा प्रवेश नियमात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उप अभियंता (स्थापत्य/मेकॅनिकल/विद्युत) या संवर्गातील पदांच्या नेमणूकीच्या अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीमध्ये सेवाप्रवेश नियमात महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५४, ४५५, ४५७(३) व ४६५ अन्वये, सुधारणा करण्यास परिशिष्ट- '१' 'अनुसूची-अ' प्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या नियमास "नवी मुंबई महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१" चा सुधारित भाग असे संबोधण्यात यावे.

३. सदर सुधारित नियम, आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिध्द करावेत. हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. या आदेशानुषंगीक सर्व सांविधानिक बाबींची पूर्तता आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी करावयाची आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८२८१६१७१८१५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.08.28 16:35:25 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत:-** परिशिष्ट- '१' 'अनुसूची-ब'

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
३) जिल्हाधिकारी, ठाणे.
४) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
५) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती ( नवि-२८ )

**शासन निर्णय क्र. नमुंमम-१२२४/सं .क्र. ५१/ प्र. क्र. २०/नवि-२८, दि. २८ ऑगस्ट, २०२४ सोबतचे**

**परिशिष्ट-१, अनुसूची-'ब'**

**महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम- ४५४, ४५५, ४५७(३) व ४६५ अन्वये विहित शैक्षणिक व इतर अर्हता व नेमणूकीच्या पध्दत.**

**(पहा नियम-३)**

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | टक्केवारी | नवी मुंबई महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मध्ये दि.२४.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूद. | पदनाम, नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीत व टक्केवारीमधील सुधारित तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| २० | उप अभियंता (स्थापत्य) (श्रेणी-१, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती-१००% | नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहायक अभियंता (स्थापत्य)/शाखा अभियंता (स्थापत्य) या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहायक अभियंता (स्थापत्य)/शाखा अभियंता (स्थापत्य) या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या किंवा कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदावर किमान १० वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| २५ | उप अभियंता (मेकॅनिकल) (श्रेणी-१, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती-१००% | नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहायक अभियंता (मेकॅनिकल)/शाखा अभियंता (मेकॅनिकल) या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहायक अभियंता (मेकॅनिकल)/ शाखा अभियंता (मेकॅनिकल) या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या किंवा कनिष्ठ अभियंता (मेकॅनिकल) या पदावर किमान १० वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ३२ | उप अभियंता (विद्युत) (श्रेणी-१, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती-१००% | नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहायक अभियंता (विद्युत)/शाखा अभियंता (विद्युत) या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहायक अभियंता (विद्युत)/ शाखा अभियंता (विद्युत) या पदावर किमान ३ वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या किंवा कनिष्ठ अभियंता (विद्युत) या पदावर किमान १० वर्षाची सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.08.28 16:35:52 +05'30'

*************************************************